**मुंबई उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर येथील दवाखान्यातील २ अस्थाई पदे पुढे चालू ठेवण्याबाबत**

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः पदआ २०१८/ प्र.क्र.२१५/ आरोग्य-३

१० वा मजला, संकुल इमारत,
गो.ते.रुग्णालय, मुंबई-४०० ००१.
तारीखः ३० जुलै, २०१८.

<u>वाचा -</u>

**१) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक-पदआ-२०१७/प्र.क्र.११०/आरोग्य-३, दिनांक- १८.०१.२०१८.**

**२) आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्रमांक-संआसे/कक्ष-३/टे-५/मुंबईउच्च न्याय.खंडपीठ, नागपूर/अपदे/सन १८-१९/८५६८-६९/१८, दिनांक-०२.०७.२०१८.**

## शासन निर्णय-

उपरोक्त संदर्भाधीन अ.क्र. १ येथील शासन निर्णयान्वये मुंबई उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर येथील दवाखान्यातील वैद्यकीय अधिकारी, वर्ग-२ (१ पद) व औषध निर्माण अधिकारी, वर्ग-३ (१ पद) या २ अस्थाई पदांना दि.०१.०१.२०१८ ते दि.२८.०२.२०१८ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती.

२. आता या शासन निर्णयान्वये मुंबई उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर येथील दवाखान्यातील वैद्यकीय अधिकारी, वर्ग-२ (१ पद) व औषध निर्माण अधिकारी, वर्ग-३ (१ पद) या २ अस्थाई पदांना दि.०१.०३.२०१८ ते दि.३०.०९.२०१८ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर पदांवरील खर्च खालील लेखाशिर्षातून खर्ची घालण्यात यावा आणि हा खर्च सन २०१८-२०१९ या वर्षाकरीता मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

<u>मागणी क्रमांक-आर-१</u>

२२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य
०१ - नागरी आरोग्य सेवा व विषम चिकित्सा
११० - रुग्णालये व दवाखाने
११० -७ - पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - राज्य योजनांतर्गत योजना
(०६)(०१) - मुसफल क्षेत्रातील अध्यापनेतर शासकीय रुग्णालये व दवाखाने (२२१० ०२२६)

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आपुक,दिनांक - ०५.०३.२०१८ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०७३०१४३६१७७९१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Roshani Dinesh Kadam Patil

Digitally signed by Roshani Dinesh Kadam Patil
DN: CN = Roshani Dinesh Kadam Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2018.07.30 15:57:41 +05'30'

**(रो.दि.कदम-पाटील)**
अवर सचिव,महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल,महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा) (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
३. संचालक, आरोग्यसेवा, मुंबई.
४. सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन) मुंबई.
५. सहसंचालक, आरोग्य सेवा(रुग्णालये-राज्यस्तर), मुंबई.
६. उपसंचालक, आरोग्य सेवा, नागपूर मंडळ, नागपूर.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.
८. वैद्यकीय अधिकारी, मुंबई उच्च न्यायालय, नागपूर खंडपीठ,नागपूर
९. वित्त विभाग,(व्यय-१३) मंत्रालय,मुंबई.
१०.कार्यासन अधिकारी, सेवा-२/सेवा-३/सेवा-५/अर्थसंकल्प,सा.आ.वि.मंत्रालय,मुंबई.
११.निवडनस्ती (आरोग्य-३)